अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्क मान्यता) अधिनियम २००६ नियम २००८ व सुधारित नियम २०१२ नुसार

# वन कार्ययोजना आराखडा

सामुहिक वनहक्काचे संरक्षण व व्यवस्थापन योजना

## ग्रामसभा- मेटेजांगदा

### कालावधी
### (सन 2022-23 ते 2031-32)



## जिल्हा – गडचिरोली

| क्रमांक | अनुक्रमाणिका | पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|
| 1. | आमच्या गावा विषयी | 6 |

| | | |
|---|---|---|
| 1.1 | प्रस्तावना | 6 |
| 1.2 | पार्श्वभूमी | 7 |
| 1.3 | इतिहास | 9 |
| 1.4 | गावाची प्राथमिक माहिती | 10 |
| 1.5 | गावाची भौगोलिक माहिती | 10 |
| 1.6 | गावाची व्यावसाया संबंधी माहिती | 10 |
| 1.7 | पोलो – निसर्गाशी संबंधित सन | 11 |
| 1.8 | संघटन | 12 |
| 1.9 | इतर ग्रामसभा व महासंघाशी संबंध | 12 |
| 1.10 | गावात असलेल्या सुविधा | 13 |
| 1.11 | पशुधन माहिती | 13 |
| 1.12 | कृषीपिके हंगाम माहिती | 13 |
| 1.13 | पावसाची सरासरी | 14 |
| **2** | **वनव्यवस्थापन आराखड्याविषयी** | **14** |
| 2.1 | उद्देश व कृती | 14 |
| 2.2 | सामुहिक वनसंपत्ती क्षेत्राचा तपशील | 16 |
| 2.3 | सीमा व हद्दीची स्थिती | 16 |
| 2.4 | समुदायीक वन हक्क प्राप्त जंगलावरील सद्यस्थितीतील अडचणी व धोके | 16 |
| 2.5 | जमिनीचा वापर तक्ता | 16 |
| 2.6 | भूभाग/जलभाग यादी | 17 |
| 2.7 | ग्रामसभेद्वारा सीमांकन केलेला नकाशा | 17 |
| 2.8 | वनक्षेत्रातील टापू (पारंपारिक ) संबधी माहिती | 18 |
| 2.9 | वृक्षांचा विविध भूभागावर संख्यात्मक अंदाज | 18 |

| | | |
|---|---|---|
| **3** | **वनहक्क अंतगर्त मिळणाऱ्या लाभांची गरज आणि वापर तपशील** | 26 |
| 3.1 | पत्रक 1 अन्न | 26 |
| 3.2 | पत्रक 2 चारा | 28 |
| 3.3 | पत्रक 3 जाळाऊ लाकूड | 30 |
| 3.4 | पत्रक 4 घर बांधणी | 31 |
| 3. 5 | पत्रक 5 कृषि अवजारे | 31 |
| 3.6 | पत्रक 6 कुंपण घालणे | 32 |
| 3.7 | पत्रक 7 संस्कृती | 33 |
| 3.8 | पत्रक 8 वन औषधी | 34 |
| 3.9 | पत्रक 9 इतर | 37 |
| 3.10 | समुदायाने विक्रीसाठी जमा केलेल्या वनउपजचे विश्लेषण | 38 |
| **4** | **ग्रामसभा सक्षमीकरण** | 39 |
| 4.1 | हक्क | 39 |
| 4.2 | नियम | 39 |
| **5** | **शासकीय योजना** | 42 |
| 5.1 | वन आधारित योजना | 42 |
| 5.2 | आदिवाशी विभाग योजना | 42 |
| 5.3 | कृषी आधारित योजना | 42 |
| 5.4 | पशूसंवर्धन योजना | 42 |
| 5.5 | रोहयो | 42 |
| 5.6 | सिंचन विभाग | 42 |
| 5.7 | मत्स्य विभाग | 42 |
| **6** | **गौणवनउपज आधारित आजीविका कार्यक्रम** | 57 |
| **7** | **परिशिष्ट** | 57 |

| 7.1 | पटवारी नकाशा | 57 |
|---|---|---|
| 7.2 | सिमांकित सामुहिक वनहक्क क्षेत्राचा नकाशा (GPS) | 58 |
| 7.3 | नजरी नकाशा | 58 |
| 7.4 | वनस्पती उपलब्धता (गोंडी – मराठी – इंग्रजी) | 59 |
| 7.5 | दुर्मिळ वनस्पतींची यादी | 78 |
| 7.6 | प्राण्यांची/वन्यजीव माहिती | 79 |
| 7.7 | खनिज | 83 |
| 7.8 | बाम्बु चक्र | 84 |
| 7.9 | हंगामानुसार करावयाच्या कामाचे वेळापत्रक | 86 |
| **8** | **वर्षनिहाय कार्य योजना** | **88** |
| 8.1 | वर्ष – मार्च 2022 - एप्रिल 2023 (1) | 88 |
| 8.2 | वर्ष – मार्च 2023 - एप्रिल 2024 (2) | 89 |
| 8.3 | वर्ष – मार्च 2024 – एप्रिल 2025 (3) | 91 |
| 8.4 | वर्ष – मार्च 2025 - एप्रिल 2026 (4) | 93 |
| 8.5 | वर्ष – मार्च 2026 - एप्रिल 2027 (5) | 95 |
| 8.6 | वर्ष – मार्च 2027 - एप्रिल 2028 (6) | 97 |
| 8.7 | वर्ष – मार्च 2028 - एप्रिल 2029 (7) | 99 |
| 8.8 | वर्ष – मार्च 2029 - एप्रिल 2030 (8) | 102 |
| 8.9 | वर्ष – मार्च 2030 – एप्रिल 2031 (9) | 105 |
| 8.10 | वर्ष – मार्च 2031 – एप्रिल 2032 (10) | 107 |
|  | **मार्गदर्शक/सहभागी व्यक्ती व छायाचित्रे** | 109 |


# ठराव

**ग्रामसभेचे नाव: मेटेजांगदा**
**ग्राम पंचायतीचे नाव:** जांगदा बु.
**तालुक्याचे नाव:** धानोरा

**जिल्हा:** गडचिरोली
**दिनांक:**
**ठराव:**
क.) असे घोषित करण्यात येते की, यासोबत जोडलेल्या व्यवस्थापन आराखड्यावर चर्चा झाली आहे आणि सदर व्यवस्थापन आराखडा आजपासून. 10 वर्षे या कालावधीसाठी स्वीकारण्यात आला आहे.
**ख. )** असेही घोषित करण्यात येते की, सोबतचा आराखडा वन विभागाच्या आराखडा / सूक्ष्म आराखडा / चालू आराखडा (Management Plan / Micro Plan / Working Plan) यांच्याशी खालीलप्रमाणे सुसंगत राहिल
**i)** सोबतचा व्यवस्थापन आराखडा यापुढे वन विभागाच्या वनव्यवस्थापन आराखडा / सूक्ष्म आराखडा / चालू आराखडा यामध्ये अंतर्भूत असेल.
**ii)** वन विभागाच्या व्यवस्थापन आराखडा / चालू आराखडा / सूक्ष्म आराखडा यातील या सामूहिक वन संसाधन व्यवस्थापन आराखड्याशी सुसंगत नसलेला भाग यापुढे वगळण्यात आला आहे असे समजण्यात येईल. वन विभागाने विनाविलंब याबाबत खात्री करावी.
**ग.)** सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती यांना या आराखड्याची प्रत स्थानिक जिल्हा वन संरक्षक यांना पाठविण्याबाबत सूचित करण्यात येत आहे.
**घ.)** याद्वारे असेही घोषित करण्यात येते की, ही ग्रामसभा जेंव्हा गरज भासेल तेंव्हा हा व्यवस्थापन आराखडा सुधारीत करणे, तसेच वन विभागाच्या सुक्ष्म / चालू आराखड्यातील भाग सुधारीत करणे याबाबतचा हक्क राखून ठेवत आहे.
**च.)** यानंतर असेही घोषित करण्यात येते की, कोणीही या सामूहिक वनहक्क क्षेत्रामध्ये व्यवस्थापन, वृक्षारोपण, वृक्षतोड आणि वनांचे पुनरुज्जीवन यासारखे उपक्रम या ग्रामसभेच्या पूर्व सूचित परवानगीशिवाय घेणार नाही.



# 1. आमच्या गावाविषयी

## 1.1. प्रस्तावना

इंग्रजांच्या वसाहत काळात तसेच स्वातंत्र्यानंतर वनांच्या एकत्रीकरणात आदिवासी व वनात पिढ्यानपिढ्या वास्तव्य करणाऱ्या जन समुहावर झालेला ऐतिहासिक अन्याय दूर करण्यासाठी करण्यात आलेला भारत सरकारचा कायदा "अनुसुचित जमाती व इतर पंरपंरागत वननिवासी ( वन ह्क्क मान्य करणे) अधिनीयम 2006 नियम 2008 व सुधारित नियम 2012" नुसार कलम 3(1) नूसार सामुहिक वन हक्क मिळण्याचे अधिकार प्राप्त झाले. यामध्ये अनुसूचित जमाती किंवा इतर पारंपारिक वननिवासी यांना सामुहिक वन हक्कांतर्गत निस्तार सारखे हक्क, गावाचे सिमेंतर्गत किंवा सिमेबाहेर पारंपारिकरित्या गोळा केले जाणारे वन उत्पादन, त्याचा वापर करणे किंवा त्याची विल्हेवाट लावणे यासाठी स्वामित्व हक्क, पाण्यामधील मत्स्य व अन्य उत्पादने, चराई करणे, पारंपारिक मोसमी साधनसंपत्ती मिळविणेइत्यादी हक्क आहेत.
अनुसुचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वन हक्काची मान्यता) अधिनियम 2006 अस्तित्वात आल्यानंतर अनुसुचित जमाती व अन्य पारंपारिक वननिवासी (वन हक्काची मान्यता)नियम 2008 व सुधारित नियम 2012 तयार करण्यात आले.सुधारित नियम 2012 चे नियम 4(1)(च) नुसार अनुसुचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासीं यांच्या फायद्यासाठी अश्या सामुहिक वन संसाधनाचे शाश्वत व समसमान व्यवस्थापन करण्यासाठी सामुहिक वन संपत्तीचे संवर्धन करण्याची व तीचे व्यवस्थापन करण्याची योजना तयार करणाऱ्या वन विभागाच्या सूक्ष्मदर्शक आराखडा किंवा कार्यआयोजना किंवा व्यवस्थापन योजनाबरोबर संवर्धन व व्यवस्थापन योजना समितीला करणे आवश्यक वाटेल अश्या फेरबदलाविषयी एकत्रीकरण करणाऱ्या खंड

(ङ) नुसार गठीत करण्यात आलेल्या समितीचे संनियंत्रक व नियंत्रण करणे अशी जबाबदारी ग्रामसभाना देण्यात आली. कायद्यातील नियम 4(1)(च) च्या तरतूदीनुसार कर्तव्ये पार पाडण्यासाठी ग्रामसभा तिच्या सदस्यामधून नियम 4(1)(ङ) नुसार स्थापन केलेल्या समितीला "सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समिती" (Community Forest Rights Management Committee)असे संबोधण्यात यावे. सदर समितीचे संनियंत्रन व नियंत्रन ग्रामसभा करेल. ग्रामसभेतील सामूहिक वन संपत्तीचे संवर्धन व व्यवस्थापन योजना तयार करणे, नैसर्गिक साधन संपत्तीच्या व्यवस्थापनातून प्राप्त होणारा महसुल तसेच शासनाकडुन प्राप्त होणारा निधी यांचे बँक खात्यामार्फत संनियंत्रण करणे, जमाखर्चाचे लेखे व लेखापरिक्षण ठेवणे इत्यादी प्रशाकीय बाबी पार पाडण्याकरीता सदर समिती ही वनहक्क कायद्याच्या अंमलबजावणीसाठी ग्रामसभेची कार्यकारी समिती असेल.त्यामुळे सामुहिक वन हक्कांतर्गत प्राप्त क्षेत्राचा आराखडा तयार करणेची जबाबदारी ग्रामसभा व ग्रामसभाद्वारे नियुक्त सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समितीस या कायद्याने देण्यात आली आहे.त्यानुसार आराखडा तयार करण्यात आला आहे.

## 1.2 पार्श्वभूमी

मेटेजांगदा या ग्रामसभेला 6मे2013 रोजी मिळालेल्या सामूहिक वनहक्काचे हक्क जोडपत्र 3 नुसार 1626,43 हे, आ क्षेत्र मिळालेली आहे, गावाला वनहक्क सरकारने दिले म्हणजे आता सर्व जल, जंगल, जमीन ही गावकऱ्यांचीच झाली परंतु असा नाही की आता आपण सर्व जंगल संपवून टाकायचा तर या जंगलाला पुन्हा वेगवेगळ्या जैवविविधतेणे सजवायची जीमेदारी सुद्दा सरकारने आपल्याला दिलेआहे

आता पर्यंत आपला नाही असा समज धरून आपल्याला जंगलातील काही वस्तू आणायचे असल्यास ते खोडा सकट किंवा मुळा सकट आणायचे परंतु आता मात्र हे जंगल आपलाच धन आहे तर त्याला कोणत्या पद्धतीने जपायचे त्याची कशी रक्षा करायची याचा सर्व विचार विनिमय करुन योग्य निर्णय घेणे आवश्यक होते त्यासाठी करायची उपाययोजना म्हणजे आपल्या जंगलाची कार्ययोजना

तर ती कशी राहील आता पर्यंत फॉरेस्ट डिपार्टमेंट कशा पद्धतीने जंगलाचा संरक्षण करत असे ते आपल्याला माहीतच आहे ते सुद्धा आपल्या कार्ययोजनेप्रमाणे काम करत असे मात्र आपण ही तशीच करायचे का?की वेगळी करायचे

तर फॉरेस्ट डिपार्टमेंट च्या कार्ययोजने मध्ये फक्त टिम्बर म्हणजेच इमारती लाकूड यालाच सर्वात जास्त महत्त्व असे मग आपल्याला विचार करायला पाहिजे की आपल्या गावासाठी आणि लोकांसाठी काय काय आवश्यक आहे, आपल्या घरापूर्ती इमारती लाकूड, ईदनासाठी लाकूड खाण्या साठी वासते आपली थोडी फार पैसाची गरज भागविण्यासाठी गैनउपज (चार, आवळा,, डिंक,हिरडा, बेहडा ई)आपल्या गुरांसाठी चारा आणि फार महत्त्वाचा म्हणजे आपले लाखो रुपये वाचवून आपला करोडो रुपयाचा जीव वाचवण्याऱ्या औषध वनस्पती एवढे सारे गोष्टी आपल्याला वनहक्क अंतर्गत मिळाले आहेत, मग याचा फायदा फक्त आपणच घेऊन सोडायचा का?नाही, तर पिढ्यानपिढ्या ठिकला पाहिजे आणि आपल्या समोरच्या सर्व पिढी पर्यन्त पोहचलीच पाहिजे या साठी आपल्याला या सर्व गोष्टींचा विचार करून आपली गरज, गुरांची गरज, जंगलातील प्राण्यांची गरज या सर्वांची गरज भागवून पुन्हा टिकुन राहीलअश्यापद्धतीची कार्ययोजना तयार करीत आहे आणि आमच्या सर्व मेटे जांगदा वासीय जनता सर्वांच्या सहकार्याने आम्ही ही कार्ययोजना तयार करू आणि त्यानुसार आमच्या वनहक्कांचा पुरेपूर फायदा घेऊ.



**आमची ग्रामसभा**

**ग्रामसभेचे नाव:- मेटेजांगदा**

**ग्रामपंचायत**: जांगदा बु.

**तालुका:** धानोरा

**जिल्हा:** गडचिरोली

**सेन्सस कोड: 538945**

**अ.अक्षांश** : 20.345734N

**ब. रेखांश** : 80.2927517E

**जोडपत्र दिनांक:** 06/05/2013

**वनाधिकार अभिलेख (जोडपत्र )**

| हक्क | होय/नाही | शेरा |
|---|---|---|
| 1) निस्तार हक्क | होय | निस्तार पत्रका प्रमाणे मान्य |
| 2) गौण वनोत्पादनावरील हक्क | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (ग) प्रमाणे मान्य |
| 3) अन्य सामूहिक हक्क जसे- अ) वापर किंवा हक्कदारी असलेले (जल)<br>ब) चराई ( जंगल) | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (घ) प्रमाणे मान्य |
| 4) जैविक विविधता, बौद्धिक संपत्ती व पारंपरिक ज्ञान यांच्या हक्कांची सुगमता. | होय | जैवविविधता कायद्यानुसार गठीत ग्रामस्तरीय समितीला हक्क |
| 5) अन्य पारंपरिक हक्क. | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (झ) प्रमाणे मान्य |



## 1.3 इतिहास

मेटेजांगदा यात मेटे म्हणजे खूप सारे डोंगर , आणि जांगदा म्हणजे जवडच्या गावाच्या नावावरून पडलेला नाव.गावाच्या जंगल परिसरात जास्तीत जास्त मोठं मोठे डोंगर आहेत त्यामुळे याचे नाव मेटेजांगदा असे पडले.

पूर्वी मेटेजांगदा हा गाव जवडच असलेल्या जांगदा बु. या गावाचाच एक पाडा(टोला) होता

आणि यामध्ये फक्त एकच आदिवासी परिवार राहत होता,कालांतराने इतरही आदिवासी बांधव या ठिकाणी येऊन राहू लागले. व हळूहळू गावातील लोकांची व आदिवासी कुटुंबाची संख्या वाढायला लागली , त्या वेळी हा गाव मेटेजांगदा खुर्द म्हणून ओडखल्या जात असे. नंतर एका सर्वे दरम्यान याचे नाव बदलून फक्त मेटेजांगदा ठेवण्यात आले.
लोक आपल्या जंगल हद्दीची सीमा निश्चित करून जंगलाचे सौरक्षण करायला लागले. आणि वनहक्क कायद्याची माहिती होताच वनहक्क मिळण्यासाठी अर्ज केला आणि 6 मे 2013 ला वनहक्क प्राप्त झाले.
गावकऱ्यांनी मिळून आपली स्वतःची वेगळी ग्रामसभा तयार करण्याचे निर्णय घेतले. आणि 2014 मध्ये ग्रामसभा स्थापन केली. आणि वनहक्क अंतर्गत आपल्या जंगल सौरक्षणाचे नियम आणखी घट्ट केले, दररोज गस्ती करायची आणि कुणालाही आमच्या जंगलमधून काहीही चोरी करू द्यायचे नाही, तसेच कोणत्याही गावातील जनावरे चराईसाठी येऊ द्यायचे नाही. गावातील शाळेमध्ये संगणक घेऊन दिले,पिण्याच्या पाण्यासाठी हातपंप खोदले, गावातील लोकांचे राहणीमान ही सुधारू लागले. तसेच फार महत्वाचे म्हणजे की , लोकांना आपण जतन केलेल्या जंगलमधून आपल्याला किती प्रमाणात नफा होतो हे सुद्धा लक्षात आले.आणि पुन्हा जंगला विषयीची आपुलकी लोकांमध्ये तयार झाली, तसेच इतर गावानाही लक्षात आले की मेटेजांगदा येथील लोकांनी वनहक्क अंतर्गत जे काही केले त्यात त्यांचा तर फायदा झालाच परंतु सोबत आमचाही फायदा झाला आणि याच्या समोर सुद्धा होत राहील. अशाप्रकारे गावातील लोकांना आणखी जंगल राखण्याची , जंगल वाढवण्याची एक चांगली सवय लागली.



### 1.4 गावाची प्राथमिक माहिती

| गावाचे नाव | मेटेजांगदा |
|---|---|
| ग्रामपंचायत | जांगदा बु. |
| तालुका | धानोरा |
| जिल्हा | गडचिरोली |
| गावातील कुटुंबाची संख्या- | अनुसूचित जमाती (ST)- 46 |
| पुरुष लोकसंख्या | 113 |
| स्त्री लोकसंख्या | 125 |
| एकूण लोकसंख्या | 250 |
| अनुसूचित जमाती लोकसंख्या | 238 |

### 1.5 गावाची भौगोलिक माहिती

| अ. क्र. | खात्याचे प्रकार | क्षेत्र हे. |
|---|---|---|
| 1 | वन | 1626 |

| 2 | झुडपी जंगल | 0 |
|---|---|---|
| 3 | आखर | 1 |
| 4 | गावठाण | 2 |
| 5 | तलाव/बोडी | 5 |
| 6 | मसानवट | 1 |
| 7 | ढोरफोडी | 1 |
| 8 | पाट | 1 |
| 9 | खातखुड्या | 0 |
| 10 | रस्ते | 2 |
| 11 | नदी/नाले | 5 |
| 12 | पोटखराब | 3 |
| | **एकूणक्षेत्र** | **1646** |
| **अ. क्र.** | **खात्याचे प्रकार** | **क्षेत्र हे.** |
| 1 | बागायत | 0 |
| 2 | जिरायत | 200 |
| | **एकूण** | **200** |



## 1.6 गावाची व्यवसाया संबंधी माहिती

| **व्यवसाय** | **कुटुंबाची संख्या** |
|---|---|
| शेती | 46 |
| पशुधन | 46 |
| दुधाचा व्यवसाय | 0 |
| वनउपज गोळा करणारी कुटुंब | 46 |

## 1.7 पोलो – निसर्गाशी संबंधित सन

| नाव | वेळ | निसर्ग संपदा |
|---|---|---|
| शिमगा पोलो(मोहडोंगरी) | होळी या सणाच्या पहिल्या दिवशी करतात | मोहडोंगरी म्हणजे होळीच्या पहिल्या दिवशी करतात या पोलो मध्ये मोह पडण्यास सुरुवात होते म्हणून तते मोह पहिले देवी देवतांना अर्पण केले जाते तेव्हा पासून मोह वेचने सुरुवात होते |
| सँजोरी | धान पीक जमा करून दिवाळी झाल्यावर करतात | सँजोरी हा पोलो धान पिक जमा झाले की दिवाळी च्या नंतर करतात हा पोलो केल्या शिवाय शेतात जमा झालेल्या पिकांची मळणी करण्याकरिता जो साफ करून शेणाने सारवले जाते त्याला करा(कळा)म्हणतात त्या कर्यांमध्ये विशिष्ट जातीचे एक लहान झाड रोवतात त्याला मेळ(मेळी)म्हणतात तर हा सर्व कार्य सँजोरी पोलो केल्या शिवाय आदिवासी लोक करत नाही |
| दसरा | दसरा पोलो हा ऑक्टोबर महिन्यात येतो | दसरा हा पोलो साधारण ऑक्टोबर महिन्यात येतो या पोलो मध्ये देवी देवतांची स्वच्छ पाण्याने आंघोळ केली जाते आणि आपल्या घरातील जी काही औजारे असतील त्यांना सुद्धा पाण्याने धुतले जाते आणि देवी देवतांना व औजारान कोहळ्याची पूजा केली जाते आणि तेंव्हा पासुन कोहळा खाण्यास सुरुवात होते |
| नवा पोलो | जेव्हा नविन पिक निघायला सुरुवात होते तेंव्हा करतात | नवा पोलो म्हणजे नविन पीक निघतो तेव्हा त्या पिकांची पूजा केली जाते व देवी देवतांना पहिले अर्पण केले जाते तेव्हा नविन पीक खाण्यास सुरुवात होते |
| बिजोरी | जून महिन्याच्या सुरवातीला करतात | बिजोरी हा पोलो जून महिन्याच्या सुरुवातीला करतात पोलो केल्या शिवाय शेतात बीज टाकत नाही व हा पोलो झाल्या शिवाय शेतात शिदोरी नेता येत नाही |



## गावातील सामुहिक देवस्थान

| अ.क्र. | नाव | स्थान |
|---|---|---|
| 1 | नार माता/ गाव माउली/ माराई | गावात |
| 2 | गढ माता | जंगलात |
| 3 | पाट देव | जंगलात |
| 4 | ठाकूर देव/चिकाटी/ भूम्याल / तल्लूर मुते | शेतात |
| 5 | महादेव | तलाव (इतूम टोला) |
| 6 | भीम देव | पटची दान |

## 1.8 संघटन

गावामध्ये कोणतेही सामूहिक काम करायचे असल्यास त्यासाठी एखादी संघटना किंवा समिती असणे आवश्यक आहे. अन्यथा तो काम कधीच चांगला होत नाही कारण त्या कामावर कुणाचीही लक्ष राहत नाही.त्यामुळे गावामध्ये सुद्धा असे काही समित्या स्थापन करणे आवश्यक असते.

1) वनहक्क समिती
2) सनियंत्रण समिती
3) जैवविविधता समिती
4) बँकेच्या व्यवहारासाठी समिती
5) वेगवेगळे पास देण्यासाठी समिती
6) तंटामुक्त समिती
7) लेखापाल

यासाठी योग्य व्यक्ती आणि गरजेनुसार समिती तयार करणे आवश्यक आहे.

## 1.9 इतर ग्रामसभा व महासंघाशी संबंध

गावाजवळ असलेले सर्व ग्रामसभा एकत्र मिळून तेंदू लिलावसारख्या प्रक्रियेत सहभाग घेतात. एखाद्या गावाला काही अडचण किंवा फसवणूक झाल्यास ते आधी आपल्या जवळच्या ग्रामसभाशी चर्चा करून नंतर महासंघमध्ये विषय मांडतात.

## 1.10 गावात असलेल्या सुविधा

गावातील सेवा, सुविधा आणि त्यांचे अंतर खालील प्रमाणे आहे–

| अ.क्र. | सुविधा व यंत्र संसाधन | अंतर |
|---|---|---|
| 1 | प्राथमिक शाळा | गावात |
| 2 | अंगणवाडी | गावात |
| 3 | गट ग्रामपंचायत कार्यालय | 2 किमी |
| 4 | आरोग्य उपकेंद्र | 2 किमी |
| 5 | तलाठी कार्यालय | 5 किमी |
| 6 | स्वस्त धान्य दुकान | 5 किमी |
|  | पोष्ट ऑफिस | 5 किमी |
|  | तालुका | 17 किमी |
|  | जिल्हा | 47 किमी |

## 1.11 पशुधन माहिती

| अ.क्र. | पशुधनाचे प्रकार | संख्या |
|---|---|---|
| 1 | गाय- बैल | 100 |

| 2 | म्हैस- रेडे | 16 |
|---|---|---|
| 3 | शेळी/बकरे | 80 |
| 4 | कोंबडी | 300 |
| 5 | डुक्कर | 60 |

### 1.12 कृषी पिके हंगाम माहिती

| अ.क्र. | हंगाम | खरीप (हो/नाही) | रब्बी (हो/नाही) |
|---|---|---|---|
| 1 | धान | हो | हो |
| 2 | भाजीपाला | नाही | हो |
| 3 | तूर | नाही | हो |
| 4 | चना | नाही | हो |
| 5 | मुंग | नाही | हो |
| 6 | जवस | नाही | हो |
| 7 | उळीद | नाही | हो |

### 1.13 पावसाची सरासरी

| वर्ष | पाऊस (मी.मी.) |
|---|---|
| 2015 | 848 |
| 2014 | 1266 |
| 2013 | 2368 |
| 2012 | 1568 |
| 2011 | 1214 |
| 2010 | 1769 |
| 2009 | 1124 |
| 2008 | 1272 |
| 2007 | 1874 |
| 2006 | 1564 |
| 2005 | 1682 |
| 2004 | 1315 |

## 2. वन व्यवस्थापन आराखड्याविषयी

### 2.1 उद्देश आणि कृती

| उद्देश | कृती |
|---|---|
| 1) वनाचे संरक्षण करणे:- | 1. वनाचे वनव्यापासुन ऱ्हास थांबवणे.<br>2. निसर्गातून मिळणाऱ्या विविध लाभांना, गौण उपजांना वाढविणे व टिकवून ठेवणे<br>3.आपल्या जंगलातून चोरी होणाऱ्या मालाला रोख लावणे व दंडात्मक कार्यवाही करणे.<br>4.जंगल सौरक्षण साठी गावात नियमावली तयार करणे.<br>5.सीमांकन करणे.<br>6.रोपवाटिका तयार करणे. |

| | |
|---|---|
| | 7.औषधी वनस्पती व चराई साठी चारा तयार करणे.<br>8.वनस्पतींची यादी बनवणे.<br>9.वेगवेगळ्या भुदृश्यांची यादी बनवणे.<br>10.जंगलाचे शाश्वत पद्धतीने वापर करणे.<br>11.वेगवेगळ्या भुदृश्यांची नकाशे तयार करणे.<br>12वनस्पती लागवडी नंतर त्यांची निघा राखणे.<br>13.वृक्षांची दर हेक्टरी संख्येचा अंदाज काढणे. |
| 2) जंगलातील जैवविविधतेचे संरक्षण :- | 1) आपल्या जंगलातील जैवविविधतेचे नुकसान होत असल्यास त्यासाठी कृतिशील असणे.उदा. शिकार, अवैध मासेमारी असे अवैध काम होत असल्यास त्यास प्रतिबंध घालणे.<br>2) नष्ट होणाऱ्या वनस्पतींची कारणासहित नोंद ठेवणे |
| 3) स्थलांतर थांबवणे | 1) गावातील तरुण मुलं गावात काम नाही मिळत म्हणून बाहेर कंपनीमध्ये जातात परंतु ठेकेदाराकडून त्यांची फसवणूक होऊन वापस गावात येतात असे प्रकरण थांबविणे. तसेच<br>2) गावातील लोकांना बाहेर रोजगारासाठी जाण्याची वेळ येऊ नये यासाठी गावातच वर्षभर काम पुरले पाहिजे यासाठी वेळोवेळी रोजगार हमी किंवा इतर योजनेच्या माध्यमातून काम उपलब्ध करून देणे. |
| 4) रोजगार हमी योजना ग्रामसभा स्वतः राबवेल यासाठी प्रयत्न करणे. | वनहक्क च्या कलम ३(१)(e) नुसार रोजगार हमी यंत्रणा घोषित करणे. |
| 5) ग्रामसभेची फसवणूक टाळणे | 1) गौण वणोपजाची खरेदी ग्रामसभेतच करणे व ग्रामसभेतर्फे त्याची विक्री करणे.<br>2) गौण उपजांची मूल्यसंवर्धन व विक्री साखळी तयार करणे.<br>3) तेंदु व बांबू प्रक्रिया स्वतः ग्रामसभे मार्फत करणे.<br>4) गावात नियम तयार करणे,उदा,(ग्रामसभेचे , जंगलाचे, गौणउपज वापराचे, आर्थिक व्यवहार, निस्तार काढण्याचे ,इत्यादी) |

## 2.2 सामुहिक वनसंपत्ती क्षेत्राचा तपशील

**गावाच्या गावहद्दी येणाऱ्या वनक्षेत्राची माहिती खालील प्रमाणे-**

**A) कंपार्टमेंट नंबर तपशील :- 586, 570**

**B) सर्व्हे नंबर तपशील :- 25 ,22,51,52,67**

**C) वनक्षेत्राच्या चतु:सीमा ची माहिती -**

**पूर्व-** 572 जपतलाई
**पश्चिम-** 569 जेवलवाही
**उत्तर–** 585 सिताटोला
**दक्षिण-** 571- जांगदा (बु)

### 2.3 सीमा व हद्दीची स्थिती

सिमा जाड रेषेने साफ केलेली आहे, मुणारी लावलेले आहेत. फांद्या चोकरुन साफसूफ केली आहे, व चुना मारली आहे.गावाच्या सभोवताली डोंगर असल्यामुळे काहीही चोरी होत नाही.

### 2.4 समुदायीक वन हक्क प्राप्त जंगलावरील सद्यस्थितीतील अडचणी व धोके

1) **आंतरिक धोके :-** वणवा, वृक्षतोड, अतिक्रमण,बिमारी, हवामान बदल

2) **बाह्य धोके:-** वणवा, वृक्षतोड,चोरी,

### 2.5 जमिनीचा वापर तक्ता:

| जमिनीचा वापर | क्षेत्रफळ (हे) |
|---|---|
| शेती | 200 |
| तलाव आणि बोळी | 6 |
| जंगल | 1600 |



### 2.6 भूभाग/जलभाग यादी

| तुकडा क्रमांक | भुदृश्य प्रकार | भूरचना |
|---|---|---|
| 11 | ७. मध्यम वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 10 | ३० शेती | सपाट |
| 9 | १. खूप कमी वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 8 | ३० शेती | सपाट |
| 7 | ३० शेती | सपाट |
| 6 | २७ . दाट वृक्ष डोंगराळ (बांबू) | उंचसखल |
| 5 | १९. विरळ वृक्ष मैदानी (बांबू) | सपाट |
| 4 | १०. दाट वृक्ष डोंगराळ (मिश्र) | उभा चढ |
| 3 | ९. मध्यम वृक्ष डोंगराळ (मिश्र) | मध्यम चढ |
| 2 | ६.विरळ वृक्ष डोंगराळ (मिश्र) | कमी चढ |
| 1 | ४. विरळ वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |

## 2.7 ग्रामसभेद्वारा सीमांकन केलेला नकाशा –




## 2.8 वन ... णारी जागा) माहिती

1) निराल
2) टोंहगो
3) मट्टा तळाय,
4) वाघभुमी कोंटा,
5) अडझाल मट्टा,
6) दरबार मट्टा
7) कोंदा दमान,
8) कोटोहकल,
9) लाट गुड्रा,
10) मकेयेर कोंटा,
11) मुज्यालगोंदी कोंटा, 12) तळाय गुड्रा, 13) हिच्ची कोंटा.

## 2.9 वृक्षांचा विविध भूभागावर संख्यात्मक अंदाज

| भुदृश्य प्रकार | 10 . दाट वृक्ष डोंगराळ (मिश्र) | | |
|---|---|---|---|
| क्र. | वृक्ष | वृक्ष संख्या प्रती हेक्टर | खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.) |
| 1 | आवळा | 1.76480799 | 0.063043048 |
| 2 | कळम | 12.3536559 | 4.564083557 |

| 3 | कसई | 5.29442398 | 0.365787309 |
|---|---|---|---|
| 4 | काळे गोटे(मोठे) | 7.05923197 | 0 |
| 5 | कुंभी | 1.76480799 | 2.269549733 |
| 6 | कोजब | 8.82403996 | 6.523459808 |
| 7 | गराडी | 38.8257758 | 3.791641201 |
| 8 | गोगर | 1.76480799 | 0.420319757 |
| 9 | गोटी | 1.76480799 | 0.029716883 |
| 10 | घोगर | 5.29442398 | 0.9519093 |
| 11 | चारोळी | 5.29442398 | 0.454909872 |
| 12 | चिचवा | 1.76480799 | 0.295272909 |
| 13 | तेंदू | 19.4128879 | 11.99024285 |
| 14 | धावळा | 3.52961598 | 1.91672494 |
| 15 | पडरी | 1.76480799 | 0.619335804 |
| 16 | बांबु | 26.4721199 | 0 |
| 17 | बांबू | 74.1219357 | 0 |
| 18 | बाबू | 3.52961598 | 0 |
| 19 | बिजा | 10.588848 | 3.238550454 |
| 20 | बेल | 1.76480799 | 0.328753556 |
| 21 | भेरा | 3.52961598 | 1.979206232 |
| 22 | मोह | 5.29442398 | 3.031192333 |
| 23 | येन | 5.29442398 | 5.091473975 |
| 24 | रा झी | 1.76480799 | 0 |
| 25 | राझी | 3.52961598 | 0 |
| 26 | शिवण | 1.76480799 | 0.087647954 |
| 27 | साग | 37.0609678 | 24.3544887 |
| 28 | सालई | 3.52961598 | 2.358475681 |
| 29 | सावरी | 1.76480799 | 2.477343215 |
| 30 | सिसम | 8.82403996 | 3.75140544 |
| 31 | सुर्या | 8.82403996 | 4.348299098 |
| 32 | सूर्या | 8.82403996 | 1.187060291 |
| 33 | सेहना | 8.82403996 | 4.203759323 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **322.9598625** | |
| | | | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **१२. खूप कमी वृक्ष मैदानी (गवत)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | खैर | 5.42724456 | 0.069101824 |

| 2 | गराडी | 5.42724456 | 0.099506627 |
|---|---|---|---|
| 3 | चारोळी | 16.2817337 | 0.263493893 |
| 4 | तेंदू | 21.7089783 | 0.598724116 |
| 5 | धोबन | 5.42724456 | 0.365548649 |
| 6 | बांबू | 5.42724456 | 0 |
| 7 | बिजा | 5.42724456 | 0.199704271 |
| 8 | भेरा | 5.42724456 | 0.079855795 |
| 9 | येन | 5.42724456 | 1.051038743 |
| 10 | रोहन | 5.42724456 | 0.12131689 |
| 11 | लोखडी | 5.42724456 | 0.059125248 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **86.83591303** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **२७ . दाट वृक्ष डोंगराळ (बांबू)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कय्या | 2.94556116 | 0.065843047 |
| 2 | कळम | 8.83668347 | 0.247948647 |
| 3 | कसई | 2.94556116 | 0.131850174 |
| 4 | काकई | 2.94556116 | 0.028714038 |
| 5 | कोजब | 26.5100504 | 5.169792581 |
| 6 | गराडी | 50.0745397 | 0.922927778 |
| 7 | गोघर | 8.83668347 | 0.103065816 |
| 8 | तेंदू | 20.6189281 | 1.787818039 |
| 9 | धावळा | 5.89112232 | 0.567811309 |
| 10 | फर्लांग | 2.94556116 | 2.252586972 |
| 11 | बहवा | 2.94556116 | 0.03037828 |
| 12 | बांबु | 64.8023455 | 0.135389619 |
| 13 | बांबू | 11.7822446 | 0 |
| 14 | बिजा | 2.94556116 | 0.135389619 |
| 15 | बिबा | 2.94556116 | 0.063381844 |
| 16 | मोह | 2.94556116 | 1.103767616 |
| 17 | येन | 2.94556116 | 0.243870082 |
| 18 | साग | 47.1289785 | 3.253382532 |
| 19 | सालई | 5.89112232 | 0.250644251 |
| 20 | सिसम | 2.94556116 | 0.124911925 |
| 21 | सूर्या | 14.7278058 | 0.743892821 |
| 22 | सेहना | 2.94556116 | 0.263372187 |
| 23 | हळदु | 8.83668347 | 1.314634134 |

| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **306.3383605** | |
|---|---|---|---|
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **४. विरळ वृक्ष मैदानी (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | आवळा | 0.50877672 | 0.007486077 |
| 2 | उमरून | 0.25438836 | 0.596880002 |
| 3 | कळम | 1.27194179 | 0.210225554 |
| 4 | कसई | 2.28949523 | 0.284932471 |
| 5 | काकई | 1.01755344 | 0.008741179 |
| 6 | कुंबी | 0.25438836 | 0.041396102 |
| 7 | कुळा | 0.25438836 | 0.001070886 |
| 8 | केहका | 0.25438836 | 0.012955893 |
| 9 | केहला | 0.25438836 | 0.009087344 |
| 10 | कोजब | 0.50877672 | 0.018447977 |
| 11 | खैर | 1.78071851 | 0.072949774 |
| 12 | ग राडी | 0.25438836 | 0.005903029 |
| 13 | गराडी | 6.86848569 | 0.522399814 |
| 14 | गोघर | 0.25438836 | 0.008291771 |
| 15 | गोटी | 1.01755344 | 0.017945936 |
| 16 | घोगर | 1.52633015 | 0.162997277 |
| 17 | चारोळी | 6.61409733 | 0.648948521 |
| 18 | चीचवा | 0.25438836 | 0.116603035 |
| 19 | जांभूळ | 0.76316508 | 0.160438488 |
| 20 | तिवस | 0.25438836 | 0.011692693 |
| 21 | तेंदू | 4.57899046 | 0.654632919 |
| 22 | धावळा | 1.78071851 | 0.136781837 |
| 23 | धोबन | 2.03510687 | 0.485473495 |
| 24 | पळस | 3.05266031 | 0.139976275 |
| 25 | फर्लांग | 0.25438836 | 0.009087344 |
| 26 | बहवा | 0.76316508 | 0.121560688 |
| 27 | बांबु | 9.921146 | 0 |
| 28 | बांबू | 1.78071851 | 0 |
| 29 | बाबू | 0.25438836 | 0 |
| 30 | बिजा | 6.10532061 | 1.108834128 |
| 31 | बेल | 0.25438836 | 0.014625988 |
| 32 | भेरा | 4.07021374 | 0.496524467 |
| 33 | मोवई | 1.01755344 | 0.187400915 |

| | | | |
|---|---|---|---|
| 34 | मोह | 6.35970897 | 1.174095389 |
| 35 | येन | 13.9913597 | 2.239490838 |
| 36 | रोहन | 2.54388359 | 0.320508543 |
| 37 | लोखडी | 0.76316508 | 0.050100842 |
| 38 | साग | 6.61409733 | 0.926577107 |
| 39 | सालई | 1.27194179 | 0.215808734 |
| 40 | सिसम | 0.25438836 | 0.010494273 |
| 41 | सूर्या | 0.50877672 | 0.013103671 |
| 42 | सेहना | 3.05266031 | 0.133253381 |
| 43 | हळदु | 0.25438836 | 0.011692693 |
| 44 | हिवर | 0.50877672 | 0.230527843 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **98.70268324** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **५.विरळ वृक्ष खडकाळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | आपटा | 0.66052437 | 0.012110483 |
| 2 | आवळा | 1.32104874 | 0.015348355 |
| 3 | कसई | 0.66052437 | 0.061309319 |
| 4 | काकई | 0.66052437 | 0.006076267 |
| 5 | कुळा | 0.66052437 | 0.003831832 |
| 6 | कोजब | 3.96314623 | 0.337243306 |
| 7 | खैर | 0.66052437 | 0.006076267 |
| 8 | गराडी | 12.5499631 | 0.26415465 |
| 9 | गोघर | 1.32104874 | 0.019437745 |
| 10 | गोटी | 0.66052437 | 0.007994811 |
| 11 | घोगर | 1.32104874 | 0.015348355 |
| 12 | चारोळी | 2.64209749 | 0.019537615 |
| 13 | जांभूळ | 2.64209749 | 0.055543173 |
| 14 | तेंदू | 5.94471934 | 0.374773187 |
| 15 | धावळा | 6.60524371 | 0.313779245 |
| 16 | धोबन | 1.32104874 | 0.055863807 |
| 17 | पळस | 4.6236706 | 0.066045233 |
| 18 | बहवा | 0.66052437 | 0.004120928 |
| 19 | बांबु | 8.58681683 | 0 |
| 20 | बांबू | 0.66052437 | 0 |
| 21 | बिजा | 5.28419497 | 0.528419681 |
| 22 | भेरा | 5.28419497 | 0.204238246 |

| | | | |
|---|---|---|---|
| 23 | मोवई | 1.32104874 | 0.030381333 |
| 24 | मोह | 11.2289143 | 0.82563637 |
| 25 | येन | 13.2104874 | 1.126758478 |
| 26 | रोहन | 3.30262186 | 0.313752964 |
| 27 | साग | 9.90786557 | 0.36994266 |
| 28 | सालई | 7.26576808 | 0.259628988 |
| 29 | सिसम | 0.66052437 | 0.036210554 |
| 30 | सूर्या | 1.98157311 | 0.0502974 |
| 31 | सेहना | 0.66052437 | 0.007195855 |
| 32 | हळदु | 0.66052437 | 0.018922629 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **118.8943868** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **६.विरळ वृक्ष डोंगराळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | अकोला | 1.96182092 | 0.076497207 |
| 2 | कळम | 1.96182092 | 1.815341165 |
| 3 | कसई | 3.92364185 | 0.257483354 |
| 4 | कोजब | 9.80910461 | 1.450121643 |
| 5 | गराडी | 15.6945674 | 2.555334554 |
| 6 | चार | 1.96182092 | 0.419891607 |
| 7 | चारोळी | 3.92364185 | 0.19378772 |
| 8 | चिचवा | 1.96182092 | 1.956392647 |
| 9 | जांभुळ | 1.96182092 | 0.668944656 |
| 10 | तेंदू | 5.88546277 | 2.160702636 |
| 11 | धावळा | 3.92364185 | 0.914297738 |
| 12 | पडरी | 1.96182092 | 0.545924658 |
| 13 | पळस | 5.88546277 | 0.142784378 |
| 14 | बांबु | 17.6563883 | 0.048958212 |
| 15 | बांबू | 15.6945674 | 0 |
| 16 | बिजा | 9.80910461 | 0.956339979 |
| 17 | बेहडा | 1.96182092 | 0.854832869 |
| 18 | भेरा | 1.96182092 | 0.074327184 |
| 19 | मगी(गोंडी) | 1.96182092 | 0.461855789 |
| 20 | मोवई | 3.92364185 | 0.344518441 |
| 21 | मोह | 5.88546277 | 0.959009575 |
| 22 | येन | 5.88546277 | 0.967236928 |
| 23 | रोहन | 3.92364185 | 1.40544103 |

| 24 | साग | 17.6563883 | 4.452871187 |
|---|---|---|---|
| 25 | सालई | 3.92364185 | 1.422613872 |
| 26 | सिसम | 3.92364185 | 0.629774964 |
| 27 | सुर्या | 1.96182092 | 0.123660077 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **156.9456738** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **९. मध्यम वृक्ष डोंगराळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | आवळा | 0.63835663 | 0.008960909 |
| 2 | कळम | 2.55342651 | 0.919773347 |
| 3 | कसई | 7.0219229 | 0.690340538 |
| 4 | काकई | 2.55342651 | 0.363587376 |
| 5 | केहला | 0.63835663 | 0.008127809 |
| 6 | कोजब | 12.7671325 | 4.238591442 |
| 7 | खैर | 1.27671325 | 0.023662084 |
| 8 | गराडी | 42.769894 | 4.949200704 |
| 9 | गिरची | 0.63835663 | 0.160950938 |
| 10 | गोघर | 1.91506988 | 0.03233344 |
| 11 | गोटी | 0.63835663 | 0.005201798 |
| 12 | घोगर | 3.19178314 | 0.398298201 |
| 13 | चारोळी | 1.27671325 | 0.018785399 |
| 14 | चीचवा | 0.63835663 | 0.083228764 |
| 15 | तेंदू | 12.1287759 | 5.584653132 |
| 16 | धामण | 0.63835663 | 0.009392699 |
| 17 | धावळा | 21.0657687 | 3.100108914 |
| 18 | धोबन | 1.91506988 | 0.731187859 |
| 19 | पडरी | 0.63835663 | 0.020162046 |
| 20 | बांबु | 44.6849639 | 0 |
| 21 | बांबू | 17.2356289 | 0.014269385 |
| 22 | बिजा | 15.3205591 | 4.047791125 |
| 23 | बिबा | 1.27671325 | 0.270950673 |
| 24 | बेल | 0.63835663 | 0.370323298 |
| 25 | भेरा | 3.83013976 | 0.618998695 |
| 26 | मोवई | 1.27671325 | 0.025490841 |
| 27 | मोह | 3.83013976 | 1.281628484 |
| 28 | येन | 6.38356627 | 1.073856287 |
| 29 | वाळा | 1.27671325 | 0.028538769 |

| 30 | साग | 43.4082506 | 13.88216572 |
|---|---|---|---|
| 31 | साय | 0.63835663 | 0.160950938 |
| 32 | सालई | 11.4904193 | 1.69335789 |
| 33 | सावरी | 0.63835663 | 1.373599723 |
| 34 | सिसम | 9.57534941 | 2.877097074 |
| 35 | सुर्या | 4.46849639 | 1.727337211 |
| 36 | सूर्या | 7.66027953 | 0.954220018 |
| 37 | सेहना | 2.55342651 | 0.124787268 |
| 38 | सेहरा | 0.63835663 | 0.022803584 |
| 39 | हळदु | 1.91506988 | 0.21192246 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **293.6440485** | |

# 3. वनहक्क अंतर्गत मिळणाऱ्या लाभांची गरज आणि वापर तपशील -

## 3.1 वनस्पती वापर तपशील

### शीट 1 (अन्न)

| क्र. | वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण (%) | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | कडू भाजी | पान | मे ते जून | 99 | 1 |
| 2 | चिपळी भाजी | पान | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | 99 | 1 |
| 3 | शेरडीरा | देठ | जुलै ते ऑगष्ट | 99 | 1 |
| 4 | हळदुली | कांदे | डिसेंबर ते जानेवारी | 99 | 1 |
| 5 | पार्सेला | फळ | जानेवारी ते फेब्रुवारी | 99 | 1 |
| 6 | बोराभाजी | पान | जुलै ते ऑगष्ट | 99 | 1 |
| 7 | आंबा | फळ | मे ते जून | 25 | 75 |
| 8 | आवळा | फळ | जानेवारी ते एप्रिल | 99 | 1 |
| 9 | मोह | फुल,फळ | मार्च ते जून | 50 | 50 |
| 10 | चार | फळ | मार्च | 99 | 1 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 11 | येरोनी | फळ | डिसेंबर ते जानेवारी | 100 | |
| 12 | बोर | फळ | जानेवारी ते फेब्रुवारी | 50 | 50 |
| 13 | कुळा | फुल,शेंगा | जून ते जुलै | 75 | 25 |
| 14 | पिंपळ बार | फुल | जून ते जुलै | 75 | 25 |
| 15 | सफेद मुसळी | पान | जुलै अगस्त | 99 | 1 |
| 16 | कळू कांदे | कांदे | डिसेंबर ते जानेवारी | 99 | 1 |
| 17 | आवळा | फळ | जानेवारी ते एप्रिल | 99 | 1 |
| 18 | उमरून | फळ | मे ते जून | 25 | 75 |
| 19 | कचर कांदे | कांदे | एप्रिल ते मे | 99 | 1 |
| 20 | कवठ | फळ | एप्रिल ते मे | 99 | 1 |
| 21 | काटवल | फळ | जुलै ते सप्टेंबर | 1 | 99 |
| 22 | काटा कोहळा | फळ | नोव्हेंबर ते जानेवारी | 1 | 99 |
| 23 | कोयार भाजी | पान | जून | 99 | 1 |
| 24 | खोबर वेल | मूळ | नोव्हेबर ते जानेवारी | 99 | 1 |
| 25 | गवतीचाय | पान | बाराही महिने | 1 | 99 |
| 26 | चिंच | फळ | मे ते जून | 25 | 75 |
| 27 | बोदेले | फळ | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | 70 | 30 |
| 28 | जांभूळ | फळ | जून ते जुलै | 70 | 30 |
| 29 | टेंभरून | फळ | एप्रिल ते मे | 99 | 1 |
| 30 | धोबे | पान | ऑगष्ट ते सप्टेंबर | 1 | 99 |
| 31 | पातुर भाजी | पान | जून ते जुलै | 99 | 1 |
| 32 | बेहळा | फळ | डिसेंबर ते जानेवारी | 99 | 1 |
| 33 | मटारु | फळ,कांदे | नोव्हेंबर ते डिसेंबर | 1 | 99 |

| 34 | बांबू | कोंब | ऑगष्ट ते सप्टेंबर | 99 | 1 |
|---|---|---|---|---|---|
| 35 | डुंबर सात्या | दांडी | ऑगष्ट | 99 | 1 |
| 36 | येरू सात्या | दांडी | ऑक्टोंबर | 99 | 1 |
| 37 | सुरुंद कांदे | कांदे | नोव्हेंबर ते मे | 98 | 2 |
| 38 | वर | दांडी | जुलै ते ऑगष्ट | 99 | 1 |
| 39 | सेलवट | फळ | मार्च | 90 | 10 |
| 40 | अरकफरी | कोवळे पान | एप्रिल | 99 | 1 |

## 3.2 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 2 (चारा)

| क्र. | वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी वापर केलेले प्रमाण (%) | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 4 | डोगाल जाळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 5 | बरटूम | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 6 | पुतेर जाळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 7 | जुनाक जप्पी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 8 | हिकुम जप्पी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 13 | कोरहुची | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 14 | उतरण वेल | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 15 | उमरून | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 17 | एरोनी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 18 | कसई | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 19 | काटा भाजी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 20 | कुसार्या गवत | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |

| 24 | चिकना | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
|---|---|---|---|---|---|
| 25 | जंगली तूर | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 26 | जंगली मुंग | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 27 | जवेला | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |
| 28 | जांभूळ | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 29 | झिल्बुली | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 30 | डोर्ली वांगा | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 31 | दुर्वा | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 32 | परसोड | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |
| 33 | पातुर भाजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 34 | बोंगा भाजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 35 | रांजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |



## 3.3 वनस्पती वापर तपशील

### शीट 3 (जाळाऊ लाकूड)

| क्र. | उत्पादन वनउपज | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण (%) |
|---|---|---|---|

| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
|---|---|---|---|---|---|
| 1 | गराडी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 2 | येन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 3 | चिंच | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 4 | रोहन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 5 | झिलबुली | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 6 | सिहाना | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 7 | भेरा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 8 | बिजा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 9 | आवळा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 10 | चारा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 11 | पळस | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |



## 3.4 वनस्पती वापर तपशील
## पत्रक 4 (घर बांधणी)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण (%) | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | साग | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 2 | बांबू | ओला बांबू | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 3 | येन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

| 4 | बिजा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
|---|---|---|---|---|---|
| 5 | गराडी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 6 | सूर्या | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 8 | अंजन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 9 | रोहणी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

## 3.5 वनस्पती वापर तपशील
## पत्रक 5 (कृषी अवजारे)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण (%) | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | साग | नांगर,दांडी | मे ते जून | 10 | 95 | 5 |
| 2 | बोरी | नांगर | मे ते जून | 3 | 95 | 5 |
| 3 | भेरा | नांगर,दांडी | मे ते जून | 25 | 95 | 5 |
| 4 | कोजूब | नांगर | मे ते जून | 36 | 95 | 5 |
| 5 | करारुख | पट्टा,फन,वकर | मे ते जून | 11 | 95 | 5 |

## 3.6 वनस्पती वापर तपशील
## शीट 6 (कुंपण घालणे)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण (%) | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | बांबू | ओला/सुका बांबू | मे ते जून | 95 | 5 |
| 2 | साग | वाळलेला लाकूड | मे ते जून | 95 | 5 |
| 3 | गराडी | वाळलेला लाकूड | मे ते जून | 95 | 5 |
| 4 | बिजा | वाळलेला लाकूड | मे ते जून | 95 | 5 |
| 5 | पळस | वाळलेला लाकूड | मे ते जून | 95 | 5 |
| 6 | रोहणी | वाळलेला लाकूड | मे ते जून | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 7 | धावळा | वाळलेला लाकूड | मे ते जून | 95 | 5 |

## 3.7 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 7 (संस्कृती)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | कारण |
|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | |
| 1 | मोह | फांदी,पान | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 2 | बांबू | बांबू | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 3 | साग | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 4 | वराकली | फळ | मार्च ते मे | पूजेसाठी |
| 5 | कुळा | पान,शेंग | ऑगष्ट | पोळा सणाच्या वेळी |
| 6 | शिंदी | पान | मार्च ते मे | मोहूर/बाशिंग बनविण्यासाठी |
| 7 | माहूर | पान | मार्च ते मे | पत्राली |
| 8 | बोर | फळ | जानेवारी | वान वाटणी |
| 9 | भेरा | पान | ऑगष्ट | पोळ्यासाठी |
| 10 | तुळशी | पान | मार्च ते मे | लग्नासाठी |

| 11 | दुर्वा | पान | बाराही महिने | पूजेसाठी |
|---|---|---|---|---|
| 12 | पळस | पान | मार्च ते मे | पत्रावळी |
| 13 | परसोड | फळ | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | दिवाळी साठी |
| 14 | कडूनिंब | पान | मार्च | पूजेसाठी |
| 15 | चिंच | फळ | बाराही महिने | आंबट टाकण्यासाठी |
| 16 | आंबा | पान,फळ | मार्च | नवा साठी व पूजेसाठी |

## 3.8 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 8 (वन औषधी)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण (%) | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | हिर माटी | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 2 | नसतोंडा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |
| 3 | अदरवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 4 | पार्सेला | पंचांग | ऑगष्ट | 95 | 5 |
| 5 | कटूल कोसा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |
| 6 | दुधूम | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 7 | नयनेंडी | पंचांग | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 8 | मस्या | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 9 | डोकेमरा | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 10 | हिवीर | मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 11 | मूसतुमीर | फळ | डिसेम्बर | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 12 | तिरका | फळ | डिसेंबर ते मार्च | 95 | 5 |
| 13 | सिरेल | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 14 | चंद्रीमरा | साल,मूळ | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 15 | नाचुम | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 16 | कोरकोट जपी | पान,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 17 | बोराभाजी | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 18 | अडूळसा | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 5 | 95 |
| 19 | झरका | पंचांग | जून ते जुलै | 95 | 5 |
| 20 | आंबा | पान,साल | बाराही महिने | 5 | 95 |
| 21 | उतरणवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 22 | उमरून | पंचांग | बाराही महिने | 50 | 50 |
| 23 | उरसुळी | पंचांग | जून ते मार्च | 50 | 50 |
| 24 | कचर कांदे | कांदा | नोव्हेंबर ते जून | 95 | 5 |
| 25 | कडूनिम | पंचांग | बाराही महिने | 50 | 50 |
| 26 | करकरी (पोरा पुंगार) | पंचांग | ऑगष्ट | 50 | 50 |
| 27 | रक्त रोहणी | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 28 | कळंब | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 29 | कळूकांदे | कांदा | डिसेम्बर ते मार्च | 95 | 5 |
| 30 | कडूभाजी | पंचांग | डिसेम्बर ते मार्च | 95 | 5 |
| 31 | कवसकुरी | फळ | नोव्हेंबर ते मे | 95 | 5 |
| 32 | कोजूब | साल,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 33 | खोबरवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 34 | गराडी | साल,पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 35 | गवती चाय | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 36 | गुळवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 37 | घंटा | फळ | बाराही महिने | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 38 | घोटी | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 39 | चिकना | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 40 | भूतगांजा | बीज | जून नोव्हेंबर | 95 | 5 |
| 41 | जोन्दुरली | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 42 | डिकेमाली | डींक | डिसेम्बर ते मार्च | 95 | 5 |
| 43 | देन्डोरा | पंचांग | ऑगष्ट ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 44 | डोर्ली वांगा | पंचांग | नोव्हेंबर ते मार्च | 95 | 5 |
| 45 | तुळशी | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 46 | देव तरोटा | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 47 | धावळा | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 48 | धोबा | पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 49 | निर्गुंडी | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 50 | पडोरा | फळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 51 | परसोड | बीज | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 52 | बिबा | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 53 | बेसवेल | पंचांग | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 54 | बोर | साल,फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 55 | बोरू | मूळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 56 | भुईआवळा | पंचांग | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 57 | भुईचक्र | पंचांग | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 58 | भुईनिंब | पंचांग | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 59 | भूतगांजा | पंचांग | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 60 | माका | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 61 | भेरा | पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 62 | मालकांगुनी | पंचांग | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 63 | माहूर | साल | बाराही महिने | 95 | 5 |

